शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती या संस्थेच्या परिसरात गेट नं.१ व २ येथे सिक्युरिटी केबीन व वाचनालयाच्या बाजूस टॉयलेटचे बांधकाम व अनुषंगिक कामे करणे इत्यादी कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

शासन निर्णय, क्रमांक : जीसीबी-२०२३/प्र.क्र.१६१/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०२३

**वाचा :** १) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/शावैमबारामती/टॉयलेबांधकेबीन/६१६/आय-प/२३२, दिनांक ०९.०३.२०२३

२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/शावैमबारामती/गेटसिक्युरिटीकेबीनपुर्तताअह/१७०३/आय-प/२३, दिनांक २३.०६.२०२३

**शासन निर्णय :-**

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती या संस्थेच्या परिसरात गेट नं.१ व २ येथे सिक्युरिटी केबीन व वाचनालयाच्या बाजूस टॉयलेटचे बांधकाम व अनुषंगिक कामे करणे इत्यादी कामाच्या रुपये १,३८,२७,७१३/- (रुपये एक कोटी, अडतीस लक्ष, सत्तावीस हजार, सातशे तेरा फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अदांजित किंमत |
|---|---|---|
| १ | Construction of Security cabin Toilet Block and other work (Gate for Hospital Building, Cat Ladder, Grill, Collapsible Door and Gate for Mortuary, Library and Pharmacy Counter) at GMC and Hospital Baramati | १,३८,२७,७१३ |

**अटी :-**

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) (५३)- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०३११४०३२९६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea0596 3bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759 420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.08.03 12:02:39 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई

२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग,पुणे
७. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. निवडनस्ती (प्रशा-१).